**मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक अंतर्गत जनाई शिरसाई उपसा सिंचन (यांत्रिकी) विभाग, अहमदनगर या विभागीय कार्यालयाचे नाव बदलण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- आढावा-२०१९/प्र.क्र. ७६/२०१९/आस्था.(पुनर्रचना)**
मादाम कामा मार्ग हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ०१ जानेवारी, २०२०

**वाचा:-** १) जलसंपदा विभाग, शासन निर्णय, क्रमांक : आढावा२०१६/प्र.क्र.२२१/२०१६/आ.(प्रशि), दि.११/०४/२०१७

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक या प्रदेश कार्यालयांतर्गतच्या अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, पुणे यांच्या अधिनस्त असलेले कार्यकारी अभियंता, जनाई शिरसाई उपसा सिंचन (यांत्रिकी) विभाग, अहमदनगर या विभागीय कार्यालयांतर्गत अहमदनगर जिल्हयातील यांत्रिकी स्वरुपाची कामे केली जातात. त्यामुळे कामाच्या बदलत्या स्वरुपानुसार विभागाच्या नावात बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -:**

मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक या प्रदेश कार्यालयांतर्गत अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, पुणे यांच्या अधिनस्त असलेल्या कार्यकारी अभियंता, जनाई शिरसाई उपसा सिंचन (यांत्रिकी), विभाग, अहमदनगर या विभागीय कार्यालयाचे नाव बदलून कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग, अहमदनगर असे बदलण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर विभागीय कार्यालयाच्या मुख्यालयात, कार्यप्रकारात व रचना यामध्ये कोणताही बदल होणार नाही.
२. नावात बदलामुळे कोणताही अतिरिक्त खर्च शासनावर पडणार नाही.
३. मुदतवाढीचे प्रस्ताव सादर करताना कार्यालयाच्या नावात आवश्यक तो बदल करून मुदतवाढीचे प्रस्ताव शासनास सादर करावेत.
४. कार्यालयाच्या नावात बदल झाल्याने नवीन नावानुसार पुन्हा “नियंत्रक अधिकारी” व “आहरण व संवितरण अधिकारी” घोषित करण्यात यावे.
५. कार्यालयाच्या नावात झालेले बदल दिनांक ०१/०१/२०२० पासून अंमलात आणावेत.

२. उपरोक्त प्रमाणे नावात होणाऱ्या बदलाबाबतची आवश्यक ती सर्व कार्यवाही संबंधित कार्यालयांनी करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००१०२११४५२१८४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Gangaram Gangarkar

Digitally signed by Sunil Gangaram Gangarkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b2512fdfec4104829bc2f439e33adb2e3f823a285cfade8149e690564bc13f6, cn=Sunil Gangaram Gangarkar
Date: 2020.01.02 11:52:16 +05'30'

**(सु.गं.गांगरकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव
५. मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा
६. मा.विधानपरिषद/विधानसभा सदस्य (सर्व)
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (ज.सं.प्र. व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सचिव (ज.सं.व्य. व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
१२. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/ नागपूर
१३. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा (DTHRS) मेरी, नाशिक.
१५. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
१६. सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक.
१८. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१९. उप सचिव (सेवा)/ उप सचिव (आस्था)/उप सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई.
२०. आंतर वित्तीय सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, पुणे.
२२. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
२३. कार्यकारी अभियंता, यांत्रिकी विभाग, अहमदनगर.
२४. कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे.
(कार्यालयाच्या नियंत्रणात होणाऱ्या बदलांची नोंद घेण्यास्तव अग्रेषित)
२५. सर्व अधिकारी व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२६. कार्यासन आस्थापना (पुनर्रचना) संग्रहार्थ.